विदर्भ,मराठवाडा व उत्तर महाराष्ट्रातील नवीन व विस्तारिकरणाच्या वस्त्रोद्योग घटकांना १० टक्के भांडवली सवलत वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक बैठक - २०१६/प्र.क्र.६६५/टेक्स-५**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :-२८ फेब्रुवारी, २०१७**

वाचा :- १. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.धोरण-२०१२/प्र.क्र.२/टेक्स-२, दिनांक १ मार्च, २०१२

२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१२/प्र.क्र.२५७/टेक्स-२, दि.२१/२/२०१४

३.संचालक, वस्त्रोद्योग, नागपूर यांची विविध पत्रे

४. वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५.

५. शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६

६. शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण -२०१६/प्र.क्र.३१ /कोषा.प्रशा-५,दि.१०मे, २०१६

७. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थस-२०१७ /प्र.क्र.८९/अर्थ-३ दि. ०८/०२/२०१७

**प्रस्तावना :-**

वरील संदर्भीय अनुक्रमांक १ येथील दिनांक १ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याच्या नवीनवस्त्रोद्योग धोरणांतर्गत विदर्भ,मराठवाडा व उत्तर महाराष्ट्रातील नवीन व विस्तारिकरणाच्या वस्त्रोद्योग घटाकांना १० टक्के भांडवली सवलत देण्याची योजनासुरू करण्यात आली आहे. सदर योजनेअंतर्गत या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील विवरणपत्र क्र. १ ते ३या प्रमाणे एकूण ३ वस्त्रोद्योग घटकांना १० टक्के भांडवली सवलत वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील वस्त्रोद्योग धोरण २०११-२०१७ अंतर्गत विदर्भ, मराठवाडा व उत्तर महाराष्ट्रातील नवीन व विस्तारीकरणाच्या वस्त्रोद्योग घटकांना १०% भांडवली सवलत योजनेअंतर्गत या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील विवरणपत्र क्र.१ ते ३ या प्रमाणे एकूण ३ वस्त्रोद्योग घटकांना एकूण रु.१२,८५,२८,०००/- (अक्षरी रूपये बारा कोटी पंच्याऐंशी लाख अठ्ठ्यावीस हजार रुपये मात्र ) इतकी रक्कम १०% भांडवली सवलतीपोटी मंजूर करुन वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू वस्त्रोद्योग घटकांना वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रक्कम योजनेच्या दिशानिर्देशानुसार या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट ब मध्ये नमूद केलेल्या बँकांच्या खात्यावर R.T.G.S. द्वारे वितरीत करण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली व्याज सवलतीची रक्कम रु.१२,८५,२८,०००/- परिशिष्ट ब मधील बँकांनी या शासन निर्णयासोबतच्या “परिशिष्ट-अ”मधील त्यांच्याशी संबंधित वस्त्रोद्योग घटकांच्या कर्ज खात्यात जमा करुन त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

४. वरील प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम संबधित बँकेस वितरीत करण्याकरीता श्री.र.गं.बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच श्री. दा.अं.कुलकर्णी ,उप सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या आदेशाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन ती उपरोक्त बँकेस वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

५. यावर होणारा खर्च " मागणी क्रमांक व्ही-२, २८५१- ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (६५) मराठवाडा, विदर्भ आणि उत्तर महाराष्ट्र मधील नवीन वस्त्रोद्योग घटकांना १०% भांडवली अर्थसहाय्य (२८५१ ५९९९) दत्तमत ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

६.शासन परीपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं -२०१६/प्र.क्र.८९ /अर्थ-३, दिनांक २०एप्रिल, २०१६ अन्वये ३३ अर्थसहाय्य या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परीपत्रकातील परिछेद ७ ते १८ पैकी ७ अ, १०, ११,१२,१३,१४, १५, १६, १७, १८ या प्रकरणी लागु नाही. परिछेद ७ब,७क,८ व ९ ची या प्रकरणी लागु असलेल्या अटींची तसेच तपासणी सूचीप्रमाणे( अनुक्रमांक ९) सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

७ वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.१,२,५,६,७,८ सदर योजना ही नियमित राज्य योजनांतर्गत योजना असल्याने व अर्थसहाय्य याखाली अर्थसहाय्य वितरण असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

८. वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.३व ४ योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्ती मध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

९. वित्त विभाग परीपत्रक क्र.संकिर्ण २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१० मे, २०१६ च्या परिशिष्ट-**अ** मधील अनु.क्र.१ ते ९ संदर्भातील तपासनी सुची मधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत आहे. सदर परीपत्रकानुसार परिशिष्ट-**अ** मधीलअनु.क्र.१-९ संदर्भातील माहीती खालील प्रमाणे आहे :-

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार :-** वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७/४/२०१५ अन्वये ३३ अर्थसहाय्य या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परीपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

२) **मंजूर निधी :-**

" मागणी क्रमांक व्ही-२, २८५१- ग्रामोद्योग व लघुउद्योग, ११०, संमिश्र ग्रामोद्योग व लघुद्योग आणि सहकारी संस्था (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (६५) मराठवाडा, विदर्भ आणि उत्तर महाराष्ट्र मधील नवीन वस्त्रोद्योग घटकांना १०% भांडवली अर्थसहाय्य (२८५१ ५९९९) दत्तमत ३३, अर्थसहाय्य"या लेखाशिर्षाखाली सन २०१६-२०१७ या वित्तीय वर्षासाठी **रू.६०००.०० लक्ष**(**६० कोटी**) इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी **रु.४७१४. ७२ लाख** इतका निधी यापुर्वी खर्च झाला आहे.

३) मागील ३ महिन्यापूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :- होय

४) ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे,त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :- या योजनेखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक त्याच लेखाशिर्षाखाली प्रलंबित नाही.

५)स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :- लागू नाही.

६) वैयक्तिक लाभार्थीचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :- लागू नाही.

७) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :- लागू नाही.

८)अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमीत करण्यापुर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :- लागू नाही.

९) खरेदी विषयक प्रक्रीया अद्यावत संबंधीत शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा :- लागू नाही.

१०. वित्त विभाग परीपत्रक क्र.अर्थसं २०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०/४/२०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.९ संदर्भातील तपासनी सुची मधील याप्रकरणी लागु असलेल्या मुद्द्यांची पुर्तता होत आहे.सदर परीपत्रकानुसार अनु.क्र.९ संदर्भातील माहीती खालील प्रमाणे आहे :-

१) योजनेस प्रशासकिय मान्यता - शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक धोरण-२०१२/ प्र.क्र.१/टेक्स-२, दिनांक १ मार्च, २०१२ नुसार योजनेस प्रशासकिय मान्यता आहे.

२) निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तीची पुर्तता झाल्यानंतरच होणार आहे-. अटी व शर्तीची पुर्तता होत आहे.

३) यापूर्वीवितरीत केलेल्या ७५ % निधीचे उपयोगीता प्रमाणपत्रे- यापुर्वी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगीता प्रमाणपत्र घेण्यात आले आहे.

४) यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक / महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत:- या योजनेखाली कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत

५) निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होणार आहे -: सदर योजने अंतर्गत योजनेतील तरतुदीनूसार निधी बँकांच्या खात्यात जमा होऊन तदनंतर लाभार्थ्यांच्या खात्यात जमा केला जातो .

६) वस्तु खरेदी करण्यापुर्वी खरेदी केलेल्या अशा वस्तुंची नोंद Dead Stock रजिस्टर मध्ये घेण्यात आली असून त्याचा योग्य वापर झाला असून त्या पडून नाहीत, असे प्रमाणपत्र :-लागू नाही.

७) यामधून खरेदी करण्यापुर्वी खरेदी असल्यास प्रत्यक्ष वस्तु प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना देयके अदा केले जाणार आहे. :- लागू नाही.

८) आवश्यक त्या ठिकाणी आदीवासी सामाजिक न्याय यांची निधी वितरणास सहमती आहे :- लागू नाही.

९) प्रस्तूत योजनेत संक्षिप्त देयक प्रलंबित नाही -: कुठलेही देयक प्रलंबित नाही .

१०) निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे –होय.

११. सदर शासन निर्णय, संदर्भिय अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये प्र.स. (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि. २७-१२-२०१६ रोजी संपन्न झालेल्या बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार तसेच सदर शासन निर्णयान्वये वस्त्रोद्योग विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२८१२५४०५८५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Damodar Ambadas Kulkarni

Digitally signed by Damodar Ambadas Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60b18a0645aab292d0672d81276fe64591df1836b7234baa5bb424810f6708cf, cn=Damodar Ambadas Kulkarni
Date: 2017.02.28 12:58:32 +05'30'

**(दा.अं.कुलकर्णी )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
२.महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५. अ.मु.स. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे)
६.अ.मु.स. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई(ई-मेलद्वारे)
७.प्र.स. (वस्त्रोद्योग), स.प. व व.वि., मंत्रालय, मुंबई.(ई-मेलद्वारे)
८.संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.(ई-मेलद्वारे)
१०कार्यासन अधिकारी (३ प्रती, रोखशाखा / कार्यासन -१७ स)
११.प्रवर्तक, परिशिष्ट अ मधील वस्त्रोद्योग घटक (ई-मेल व्दारे)
१२.परिशिष्ट ब मधील बँका (टफ सेल) (ई-मेल व्दारे)
१३.परिशिष्ट अ मधील वस्त्रोद्योग घटकाच्या स्वतंत्र नस्ती
१४.निवड नस्ती (टेक्स-५)

शासन निर्णय,स.प.व वि. क्रमांक बैठक2016/प्र.क्र.665/टेक्स-5, मंत्रालय, मुंबई 400032.

दिनांक :- 28/02/2017 चे

परिशिष्ट-“अ” (क्रमांक 1 ते 3)

क्रमांक- 1

| | | |
|---|---|---|
| **Sr.No** | **:** | **1** |
| **Name and Address of unit** | **:** | **VHM INDUSTRIES LTD : Plot No. T 2, Additional Amravati Industrial Area (Textile Zone), Village: Tuljapur, Amravati, Maharashtra** |
| **Segment of Unit** | **:** | **Spinning Mill,Garmenting,Ginning ,Pressing and Processing** |
| **Unit Id** | **:** | **D/2015/10085** |
| **Date of sanction of term loan under TUF of GOI** | **:** | **21/02/2015** |
| **Project Cost (Rs. In Lac)** | **:** | **19957.00** |
| **Amount of loan eligible under TUF (Rs. In Lac)** | **:** | **4400.00** |
| **Name of Lending Agency** | **:** | **Karur Vysya Bank Ltd.** |
| **Name of Claims Submitting Agency** | **:** | **Karur Vyas Bank** |
| **Date of commencement of production** | **:** | **26/03/2016** |
| **Amount of claims recommended by the DOT,MS (Rs. in Lac)** | **:** | **431.57** |
| **Amount of claim approved by the committee (Rs. In Lac)** | **:** | **431.57** |

| | | |
|---|---|---|
| **Sr.No** | **:** | **2** |
| **Name and Address of unit** | **:** | **M/S VHM INDUSTRIES LIMITED : Plot No.T2, Additional Amravati Industrial Area, (Textile Zone), Vill. Tuljapur, Amravati** |
| **Segment of Unit** | **:** | **Composite Unit** |
| **Unit Id** | **:** | **D/2015/10104** |
| **Date of sanction of term loan under TUF of GOI** | **:** | **09/12/2014** |
| **Project Cost (Rs. In Lac)** | **:** | **19957.00** |
| **Amount of loan eligible under TUF (Rs. In Lac)** | **:** | **4400.00** |
| **Name of Lending Agency** | **:** | **Corporation Bank** |
| **Name of Claims Submitting Agency** | **:** | **Corporation Bank** |
| **Date of commencement of production** | **:** | **28/09/2016** |
| **Amount of claims recommended by the DOT,MS (Rs. in Lac)** | **:** | **439.41** |
| **Amount of claim approved by the committee (Rs. In Lac)** | **:** | **439.41** |

| | | |
|---|---|---|
| **Sr.No** | **:** | **3** |
| **Name and Address of unit** | **:** | **INNOVATIVE TEXTILES LIMITED : T-71, BUTIBORI INDUSTRIAL AREA, HINGANA, NAGPUR** |
| **Segment of Unit** | **:** | **Spinning Mill,Garmenting,Ginning ,Pressing and Processing** |
| **Unit Id** | **:** | **D/2015/10019** |
| **Date of sanction of term loan under TUF of GOI** | **:** | **28/10/2014** |
| **Project Cost (Rs. In Lac)** | **:** | **7264.67** |
| **Amount of loan eligible under TUF (Rs. In Lac)** | **:** | **4500.00** |
| **Name of Lending Agency** | **:** | **Indian Oversess Bank** |
| **Name of Claims Submitting Agency** | **:** | **Indian Oversess Bank** |
| **Date of commencement of production** | **:** | **29/06/2016** |
| **Amount of claims recommended by the DOT,MS (Rs. in Lac)** | **:** | **450** |
| **Amount of claim approved by the committee (Rs. In Lac)** | **:** | **450** |
| **Actual amount disbursed (Rs. in Lakh)** | | **414.3** |

शासन निर्णय,स.प.व वि. क्रमांक बैठक 2016/प्र.क्र.665/टेक्स-5, मंत्रालय, मुंबई 400032.

दिनांक :- 28/02/2017 चे

परिशिष्ट-"ब" (बँकांचा तपशिल)

| Sr.No | Bank Name | Account Name | Account Number | IFSC Code | Capital Subsidy Amount To Be Disbursed (In Lacs) |
|---|---|---|---|---|---|
| 1 | Corporation Bank | CORPORATION BANK MAHA TUFS | 022101601000526 | CORP0000221 | 439.41 |
| 2 | Indian Oversess Bank | Government of Maharashtra Textile Subsidy Fund Account | 160601000000623 | IOBA0001606 | 414.3 |
| 3 | Karur Vyas Bank | TUF Subsidy | 1101165000000014 | KVBL0001101 | 431.57 |
| | | | | Total | 1285.28 |